# नातं
## (दीर्घांक)

**-- चं.प्र.देशपांडे.**

अनिल आणि अनघा प्रवेश करतात. अनिल दार लावून घेतो. वादळातून आल्यासारखे. अनघाचे कपडे चुरगळलेले आणि गालावर एखादा ओरखडा. दोघांच्याही डोक्यांत विचारांचं काहूर. मूक. नवाचे टोले पडतात. नंतर अनघा एकदम रडायला लागते. प्रचंड दडपण फुटल्यासारखी ओक्साबोक्शी रडू लागते. अनिल नुसता पाहतो आणि स्वस्थ राहतो. खालमानेनं बसून राहतो.

.

अनिलः ( उठतो. बोलायचा प्रयत्न काही क्षणांनी जमतो.) -- खरं म्हणजे -- खरं म्हणजे ...मी पळालो नाही... मी पळालो ते आणखी काही लोकांची मदत मिळवण्यासाठी...म्हणजे--

अनघाः सगळं संपलं आहे आता...सगळं संपलं आहे... ( पुन्हा हुंदके ...)

अनिलः ( थोड्या वेळानं ) कॉफी घेणार ? मी करतोय.

अनघाः तू करतोयस ? का ? दोन वर्षांत आजच का ? ( अनिल आत जायला लागतो ) नकोय. काहीही नकोय मला...

अनिलः ( तसाच उभा राहून पण तिच्याकडे न पाहता ) बरं...मग...मग आता...,

अनघाः कृपा करून काहीही बोलू नकोस...तुझी बायको असल्याची लाज वाटतेय मला ...लाज ...

अनिलः कबूल आहे.

अनघाः ( संतापून ) कबूल आहे! तुला शरम नाही वाटत ? दोन तासांपूर्वी तुझ्या या बायकोचा एका परक्या पुरुषानं उपभोग घेतला आहे ! तुला शरम नाही वाटत ?

अनिलः वाटते. ( शांतता ).

अनघाः आपलं नातंच संपून गेलं आहे. तू आता माझा नवरा राहिलेलाच नाहीस. तू माझा नवरा असल्यासारखं वागू शकला नाहीस. सगळं संपून गेलं आहे.

अनिलः कोण जाणे. मी असा कसा वागलो, बरोबर काय, चूक काय, हे कशामुळं ठरलं ? -- सगळा गोंधळ उडालाय डोक्यात.

अनघाः शरम वाटायला पाहिजे तुला.

अनिलः वाटायला पाहिजेच. तुझा नवरा असून मी त्या माणसाला आणि त्याच्याजवळच्या शस्त्राला घाबरलो.

अनघाः प्रेमविवाह केला आपण -- प्रेम --( रडू लागते.) परपुरुषानं बळानं उपभोग घेतलेल्या आपल्या स्वतःच्या बायकोला तू विचारतोयस -- कॉफी हवीय का ?

अनिलः अजूनही...मला वाटतं...तक्रार नोंदवू या आपण...

अनघाः ( किंचाळते ) त्याला शिक्षा होऊन करायचीय काय आता ? ( शांतता )

अनिलः घडलंयच सगळं असं की, आपोआपच मन शरमिंदं व्हावं. माझ्या विचारावर किंवा इच्छेवर अवलंबूनच नाहीय ते.

अनघाः कृपा करून काही बोलू नकोस.

अनिलः ( जणू स्वतःशीच ) तो माणूस अगदी निकराचा होता. पिसाळल्यासारखा दिसत होता. त्याच्या हातातला सुरा रक्ताच्या तहानेनं जसा तडफडत होता --

अनघाः ( चवताळून ) तू काहीच प्रतिकार केला नाहीस -- थोडासुध्दा.

अनिलः समोर मृत्यू होता.

अनघाः हे असं नुसतं जिवंत राहणं महत्त्वाचं वाटलं तुला -- हे असं ? नपुंसकासारखं - कणाहीन --

अनिलः मी मृत्यू पत्करायला हवा होता.

अनघाः कुणाला माहीत ? चेवानं लढला असतास तर कदाचित तो घाबरून पळालाही असता.

अनिलः आणि तेवढ्याही लढतीत एखादा वार सहज वर्मी बसू शकला असता.

अनघाः नुसतं स्वतःचं जिवंत राहणं महत्त्वाचं वाटलं तुला ...

अनिलः मी मरायला हवं होतं !

अनघाः हवंच होतं. मग नंतरची कोणतीही आणि कितीही मोठी दुःखपरंपरा आपल्या अभंग नात्यानं उजळलेली वाटली असती मला.

अनिलः तुझ्या आताच्या दुःखाबद्दल वाईट वाटतंय मला. तुझ्या पाठीवरून-केसांवरून हात फिरवावा वाटतोय ; पण धीरच होत नाही.

अनघाः आता माझीही भीती वाटणारच तुला. राहिलंय काय आता तुझं ? तुला वाटतंय की आपण जिवंत राहण्यात यशस्वी झालोय.

अनिलः त्यावेळी हे इतकं सगळं खरंच लक्षातच आलं नाही माझ्या. काहीतरी घडून गेलं नुसतंच सगळं...आपलं अभंग नातं उजळ वाटलं असतं तुला...वाटलं असतं...पण...माझं काय झालं असतं?

अनघाः आता काय झालंय तुझं ? आता काय झालंय ? चेहरा बघ आरशात. शेणाच्या थप्प्यासारखा लुळापांगळा चेहरा बघ तुझा.

अनिलः आपोआपच मी तसा झालोय. माझा माझ्यावर ताबाच राहिलेला नाही... उगीच आपण इतक्या लांब फिरायला गेलो. गेलो नसतो तर हे काही घडलं नसतं. हे घडलं नसतं तर फार बरं झालं असतं.

अनघाः तुझी मला आता फक्त दया येते आहे. खरं म्हणजे किळस यायला हवीय मला तुझी.

अनिलः मी मेलो असतो म्हणजे माझा तुला अभिमान वाटला असता.

अनघाः निश्चितच वाटला असता. कारण शेवटपर्यंत तू माझा नवरा राहिला असतास.

अनिलः आणि त्यानंतरही कदाचित घडलं ते घडलं असतंच.

अनघाः चाललं असतं ते. पाहिजे तर मीही आत्महत्या करून टाकली असती नंतर.

अनिलः पोटातल्या जीवासह !

अनघाः तुझं बीज !( फुटत-रडत ) तुझं ! तू नवरा नाहीयस माझा... तू नवरा नाहीयस माझा...

अनिलः हे काही घडलं नसतं तर त्याचा जन्म सहज सरळच वाटला असता तुला. इतर कोणत्याही जन्माइतकाच.

अनघाः कीड वाढवतेय मी माझ्या गर्भाशयात. एका गोजिरवाण्या दिसणाऱ्या, मनानं लुळ्यापांगळ्या, भित्र्या, कणाहीन, अभिमानहीन, स्वत्वहीन असलेल्या किड्याचं बीज...

अनिलः तुझा संताप बरोबरच आहे अनघा. तू काहीही म्हणावंस, काहीही करावंस हेच बरोबर आहे. मी सहन करणार आहे सगळं. माझे विचारच जणू थांबलेत. मला काहीही समजत नाहीय आणि तरीही शरमेनं मी इतका काळा पडत चाललोय.( इथे बरेच क्षण रिकामे जातात.) तुझे बाबा येणार आहेत. मी स्टेशनवर जाऊन यायचं ठरलंय ना -- येऊ जाऊन ?

अनघाः आता आठवण होतेय तुला -- कशाला ? तुझी वाट बघत थांबणार आहेत ते स्टेशनवर ? काही नको जायला. येतील नाहीतर न येतील...( पुन्हा हुंदके फुटतात. )....काय राहिलंय काय आता...

अनिलः आज ते नाही आले तर बरं होईल. त्यांना हे सगळं सहन होणार नाही.

अनघाः आणि तुला सहन होतंय सगळं...धीरोदात्त, शूर पुरुष तू !

अनिलः कितीही बोलू नये म्हटलं तरी बोललं जाणारच आता... आपल्या संबंधाचा सर्वनाश कसा झाला आहे हे कळेपर्यंत चालूच राहणार हे ...आणि यात कुठलाच आधार राहणार नाही...आपलाही एकमेकांना आधार राहू शकणार नाही...आपण एकटे झालोयत...

अनघाः आता सगळी हुशारी सुचेल तुला...बाबा आले तर मी यातलं त्यांना काही बोलू नये अशी इच्छा आहे तुझी....

अनिलः नाही अनघा -- तू काय करावंस याचा विचार कराचा अधिकारच कुठं राहिलाय माझा ? अगदी परके होऊन गेलोत आपण...कुठं जाणार आहे हे सगळं काही समजत नाही... काही समजत नाही...

अनघाः समजायची आवश्यकताच काय आहे आता ? समजायला हवं होतं ती वेळ निघून गेल्यावर ? ( एवढ्यात दार वाजतं. अनिल हताशपणे, अगतिकपणे अनघाकडे पाहतो. मग जाऊन दार उघडतो. बाबा येतात. अनिल त्यांच्या हातातली पिशवी, बॅग घेतो आणि ठेवतो.)

बाबाः गाडी लेट झाली पंधरावीस मिनिटं --

अनिलः स्टेशनवर आम्हाला पाहिलं असेल तुम्ही --

बाबाः होय ना -- पण म्हटलं नसतील आले -- आलो मग -- ( अनघाला सगळं अनावर होतं आणि ती

हमसाहमशी रडू लागते. अनिल अपराधी मुद्रेने उभा.) अरे अरे -- काय झालं काय हिला ? अं ? ( ते जवळ येताच अनघा त्यांच्या गळ्यात पडून रडू लागते. त्यांच्या काही लक्षात येत नाही.) अगं, अगं, काय झालं ? इतकं काय झालं ? ( अनिलकडे पाहतात. तो तोंड फिरवून उभा.) काय भांडण-बिंडण झालं काय

तुमचं ? अगं, होतात भांडणं नवराबायकोची -- संसार म्हणजे आलंच ते सगळं --गप गप -- कमाल आहे बुवा... माधुरी, हे इतकं चांगलं नाही - काय हे ! ह्यॅ ! ( लटकेपणानं ) अनिलराव, फार भांडता वाटतं तुम्ही आमच्या पोरीशी ! छे छे छे ! फार नाजूक मनाची आहे हो ती -- चला -- माधुरी आता बस कर बघू -- चहा कर मला - जा - हं - चल ऊठ बघू - ( ती हमसतच उठते. ) हं - चला - म्हणजे आता आलं लक्षात -- मंडळी भांडणात रंगली होती म्हणून स्टेशनवर आली नाहीत -- असू दे - चला.

अनिलः तुमचं जेवणही व्हायचं असेल. तुम्ही चहा घ्या -- तोपर्यंत मी डबा घेऊन येतो.

बाबाः म्हणजे स्वयंपाकालाही बुट्टी दिसतेय -- छान !

अनघाः काही नकोय आणायला डबा --

बाबाः आता मात्र राग येईल हं मला -- अगं, किती ताणायचं ते ? -- याच्यापुढं कुठं करत बसतेयस -- आणू देत डबा -- पण थांबा की अनिलराव -- तुम्हीही चहा घेऊन निघा --

अनघाः जाऊ देत त्याला --

अनिलः जवळच आहे -- आलोच मी -- ( जातो. अनघा आत जाते. बाबा -- शर्ट काढणे, सामान बाजूला ठेवणे, हुश्श करून बसणे -- इत्यादी करत बोलत राहतात -- )

बाबाः कठीण बुवा तुम्हा पोरांचं ! घरात बाळ यायचे दिवस आणि भांडताय कसले इतके !बातमी कशी आनंदानं

कळवलीत अगदी ! अगं, मीही भांडायचो तुझ्या आईशी --तीही माझ्याशी भांडायची -- पण तुझ्या जन्माच्या आधीचे महिने म्हणजे -- वा ! आदर्श कुटुंब होतं आमचं. आता ती लौकर वारली म्हणून, नाहीतर तिच्याकडूनही हेच ऐकायला मिळालं असतं तुला -- अशा वेळी शक्य तो टाळावीत भांडणं -- एकमेकांची मनं समजून मजेत राहावं -- हे--हे तुमचं काही आपल्याला आवडलं नाही --अजिबात आवडलं नाही -- हे ताबडतोब थांबलं पाहिजे -- कारणं काहीही असोत -- हे बरोबर नाही.. आणि चूक-बरोबर काहीही असो--बायको म्हणून तू माघार घेतली पाहिजेस, असं आमचं एक आपलं जुनं मत आहे. नव्या मतांची जास्त कौतुकं करत बसू नका. आणि हे जर तुला ऐकायचं नसेल तर मी आपला जातो परत - फार काहीतरी बोललीस असणार तू अनिलरावांना--चेहरा काळवंडून गेला होता नुसता-- आता म्हातारपणात तरी चार दिवस शांत जाऊ देत आमचे--आयुष्यभर कुतरओढ झालीच आहे --
( अनघा चहाची कपबशी घेऊन येते. त्यांच्या हातात देते. काही बोलत नाही. नुसती डोळे पुसते. नाक पुसते.) काय म्हणतोय मी - अं -

अनघाः तुम्हाला वाटतंय तसं काही नाही आहे -

बाबाः अगं, मग ही काय रडारड चाललीय तुझी ?

अनघाः काही नाही - जाऊ द्या ते - तब्बेत कशी आहे तुमची ?

बाबाः बरी आहे. तुमचं कसं काय ? ही भांडणं वगैरे सोडा - बाकीचं कसं काय ?

अनघाः ठीक आहे.

बाबाः हं, मग ठीक आहे. आणि हा गालावर ओरखडा कसला तुझ्या ? इतकं झालं का अगदी ? छे छे छे छे छे ।

अनघाः आता जाऊ द्या ना ते --

बाबाः बरं, जाऊ द्या ; पण हे बरं नव्हे, इतकंच सांगतो. बरं नव्हे हे -

अनघाः तुम्हाला एकटंच राहावं लागतंय या वयात --

बाबाः अगं, माझं जाऊ दे -- मला काही नाही वाटत त्याचं -- तुझी आई जिवंत असती तर चांगली सोबत झाली असती या वयात इतकं मात्र खरं.असो ! परमेश्वराची इच्छा !

अनघाः मला तर आठवणही येऊ शकत नाही तिची. पाहिलेलंसुध्दा आठवत नाही.

बाबाः ( सुस्कारून ) जाऊ दे ! असेच आणखीही दिवस जातील -- तुझं मार्गी लागलंय एवढं एकच समाधान आहे -- तुम्ही सुखात राहा म्हणजे झालं -- असो.( उठत ) जाऊन येतो जरा - पाणी आहे ना तिकडे --

अनघाः हो -- ( बाबा जातात )...कसं सांगू तुम्हाला ? बायको म्हणून माघार घ्यायसारखं नाहीय हे -- वाटलं होतं की तुम्ही आल्यावर सगळं सगळं सांगावं -- खूप रडावं. वाताहात झालीय माझी -- उद्ध्वस्त झालाय संसार माझा ...पण...पण तुम्हीही आता माझे राहिलेले नाही आहात...वयामुळं दुबळे झालाहात तुम्ही...आयुष्यभर माझ्यासाठी केलेल्या काबाडकष्टांनंतर त्याचा सगळा थकवा आता येऊ दिलाय तुम्ही -- आणि म्हातारपण...बाबा, आता तुमचाही आधार नाही मला...तुमचाही आधार नाही....( हुंदके देते. मग हळूहळू सावरते...डोळे पुसते...अनिल डबा घेऊन येतो. दार लावतो. तिच्याकडे पाहतो. ती पाहात नाही. आत जातो. डबा आत ठेवून बाहेर येतो. अपराध्यासारखा बसून राहतो...काही क्षण... मग बाबा येतात.)

बाबाः हं -- आणलात डबा ?

अनिलः हो --

बाबाः हं -- कसं काय चाललंय ? नोकरी-बिकरी ?

अनिलः ठीक आहे...( ते काही बोलत राहतात. अनघा स्वस्थ बसून... काही क्षण... अंधार...पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा अनिल आणि अनघा.)

अनिलः बाबा वर गच्चीवर गेले झोपायला ते बरं झालं. तुझा संताप तुला मोकळा करता येईल...

अनघाः कधीच संपणार नाही तो... मनातनं बरं वाटतंय तुला -- मी काही सांगू शकले नाही त्यांना -- विसावलायस तू...बेशरम...

अनिलः अनघा, इतके दिवस प्रेम करत होतीस तू माझ्यावर...एकमेकांवर प्रेमाचे हक्क होते आपले...खरंच गोंधळून गेलोय मी...काहीच समजत नाहीय मला आणि तरीही शरमेनं इतका काळा पडतोय मी ...

अनघाः म्हणजे तुझी शरमही खरी नाही. तुला तुझं वागणं बरोबरच वाटतंय. तुझी शरम उपरी आहे.

अनिलः मला वाटतं, तुझ्या म्हणण्यात तथ्य आहे. खरंच, माझी ही शरम उपरी असण्याची शक्यता आहे. कदाचित् या परिस्थितीत माझ्याकडून हेच अपेक्षित आहे, असं मला वाटत असेल.

अनघाः म्हणजे तू नुसता भित्रा नसून क्रूरही आहेस. मग ऐक तर -- तुझा तो तेव्हाचा गोठलेला चेहरा आणि प्रतिकारहीन बुजगावण्यासारखा पौरुषहीन आविर्भाव पाहिला...आणि मग मीही त्याला प्रतिकार केला नाही...( या शेवटच्या वाक्यानं भयानक शांतता निर्माण होते.)

अनिलः म्हणजे तूही सामील झालीस !

अनघाः ते मला माहीत नाही. निदान आता माझ्या अनुभवाचं तपशीलवार वर्णन विचारायचा हिडीसपणा तरी दाखवू नकोस.

अनिलः अजब आहे. किती अनपेक्षितपणे मी एक अतिक्षूद्र -- सर्वांनी सर्व तऱ्हेच्या शिव्या द्याव्यात आणि तोंडावर थुंकावं असा -- अतिक्षूद्र माणूस झालोय ! काही तासांपूर्वीच मी एक संपूर्ण माननीय,सभ्य गृहस्थ होतो...

अनघाः जे घडलं ते बरं झालं. तुझं हे खरं स्वरूप उघडकीला आलं. नसत्या भ्रमात संसार करत राहिले असते मी तुझ्याबरोबर.

अनिलः पण हे घडलं नसतं तर तू भ्रमात आहेस हेही तुला कळलं नसतं. आणि मलाही कळलं नसतं.

अनघाः पण आता कळलं आहे.

अनिलः मलाही कळलं आहे.पण हाही एखादा नवा भ्रम तर ठरणार नाही ?

अनघाः आयुष्य फार सोपं करायला बघतोयस तू. नुसतं जिवंत राहणं म्हणजे आयुष्य वाटलं तुला. तू माझा नवरा होतास. मी तुझी बायको होते...माझं रक्षण करायची जबाबदारी होती तुझी आणि तुझ्या बायकोकडे दुसऱ्यानं अभिलाषेनं येणं...यानं स्वाभाविकपणेच चवताळायला हवं होतंस तू ...कशाचाही विचार न करता त्याच्यावर तुटून पडायला हवं होतंस...माझ्यावरचा फक्त तुझाच हक्क तुला प्रखरपणानं महत्त्वाचा वाटला असता तर हेच घडलं असतं तुझ्या हातून. पण हे घडलं नाही याचा अर्थच असा की, दुसऱ्या कुणाशी माझा संग झाला तरी चालेल हीच तुझी भूमिका होती. म्हणजे आपलं नातं मुळातच अस्तित्वातच नव्हतं. आपण कुणी नव्हतोच एकमेकांचे.

अनिलः म्हणजे या सगळ्या खऱ्या गोष्टींना धरूनच झालं वागणं माझं --

अनघाः तुझ्या वागण्यातून या खऱ्या गोष्टी उघड्या झाल्या --..त्या माणसानं कशा का पध्दतीनं असेना माझ्यावर आता त्याचा एक नवा हक्क निर्माण केलाय... निर्लज्जपणानं बघू नकोस माझ्याकडे...तो माणूस पुन्हा कधीही नुसता समोर आला तरी गोठून मरून जाशील तू. त्याच्यासमोर मला हातही लावायचं धैर्य होणार नाही तुला... त्याच्या नुसत्या नजरेनं पुतळ्यासारखा उभा राहशील तू... खरं तर त्या माणसाचे आभारच

मानते मी मनातनं...मला हवा होता तसा पुरुष तू नाहीस हे कळून आलं मला त्याच्यामुळं...बरं झालं, त्याला वाटमारीचा हेतू सोडून ही वेगळीच इच्छा झाली ।

अनिलः म्हणजे हा उद्देश नव्हताच त्याचा ? तुला कसं कळलं ?

अनघाः त्याच्याकडूनच. पैसे मिळवायला उभा होतो म्हणाला ; पण पैशाहून खूप जास्त महत्त्वाची वस्तू मिळाली म्हणाला. सगळं झाल्यावर माझं मंगळसूत्र, बांगड्या यांना हातही लावला नाही त्यानं ...( काही क्षण रिकामे...)

अनिलः इतक्याही प्रसंगातून तू हळूहळू सावरत चालली आहेस. माझा नालायकपणा अगदी व्यवस्थित सिध्द करते आहेस.

अनघाः तुझ्यासारख्या भेकड नवऱ्याची बायको दुसरं काय करणार ? ओरडून सांगेन मी लोकांना --
लोक हो SS
हा माझा नवरा --
हा निव्वळ भेकड आहे. याच्याबरोबर असताना माझ्यावर बलात्कार झाला तरी यानं काहीही केलं नाही. आता तो म्हणतोय की, मी यातूनही सावरत चालले आहे. त्याचा नालायकपणा नीट सिध्द करते आहे. आता लोकहो, तुम्हीच सांगा -- याच्यासारख्या भेकड नवऱ्याची बायको या नात्यानं मी दुसरं काय करणार ? काय कारणार ? अं ?... आई होणार म्हणे ! तुझ्यासारख्या किड्याच्या मुलाची ! ( एवढ्यात बाहेरून बाबांच्या 'माधुरी, ए माधुरी !' अशा हाका -- )

अनिलः हा म्हातारा एक नेमका आत्ताच येऊन टपकलाय. ( असं म्हणत जाऊन दार उघडतो. बाबा वळकटी घेऊन आत येतात.)

बाबाः पाऊस यायला लागला हो थोडा थोडा. म्हटलं, इथं झोपणं काही खरं नाही आणि तुम्ही अजून झोपला नाहीत काय -- भांडणं मिटली की नाही अजून --

अनिलः भांडणं मिटली की -- लग्नाआधीच्या प्रेमाच्या आणि लग्नानंतरच्या काही चांगल्या चांगल्या आठवणी काढत बसलो होतो --

बाबाः मग हरकत नाही -- हा पाऊस एक आला हो तेवढ्यात -- आणि गच्चीत वाळत टाकलेले हे कपडे आपलेच होते ना -- तेही आणले काढून -- नाही तर उद्या झाली असती पंचाईत तुमची -- सगळे भिजून गेले असते -- नाही तर तुम्ही इकडं रंगलेले जुन्या आठवणींत --

अनिलः तुम्ही खालीच झोपा आता --

बाबाः होय तर -- आता कुठं जातोय पावसात -- तरुणपणी केले बघा सगळे प्रकार मनसोक्त. अहो, भर पावसात -- पुरानं तुडुंब सुसाट वाहणाऱ्या नदीतून दोन-दोन मैल पोहत जायचो आम्ही -- जिवाची पर्वा नव्हती - जिवाची काळजी ही आता अलीकडं सुरू झाली बघा म्हातारपणात --

अनिलः ते बरोबर आहे.

बाबाः अलीकडच्या तुम्हा तरुण मंडळींना मात्र शारीरिक कष्टाचं काही महत्त्वच राहिलेलं नाही --शक्ती ही वापरून वाढत असते -- न वापरलेली शक्ती निरुपयोगी होत जाते --

अनिलः खरं आहे --

अनघाः त्याला काही सांगून उपयोग नाही बाबा, झोपा तुम्ही.

बाबाः हे-हे मला आवडत नाही - बायकोनं नवऱ्याची अशी किंमत करू नये - ही आमची शिकवण नव्हे हं अनिलराव - ही हिची स्वतः वाढवलेली अक्कल आहे.

अनिलः पण तिचं बरोबर आहे --

बाबाः बरोबर आहे ? संपलंच मग -- तुमचंच प्रोत्साहन म्हटल्यावर काय मग - ( हसतात ) विनोदानं बोललो हो -- मनावर नका घेऊ बरं. मी झोपतो आतल्या खोलीत -- तुम्हीही झोपा आता. उशीर झालाय खूप. उद्या कामावर जायचं असेल ना --

अनिलः होय ना -- नाही -- रजा आहे उद्याची --

अनघाः कर्तव्यात चुकारपणा घडायचा नाही बाबा कधी याच्याकडून - उद्याची रजा आहे ते सोडा--

बाबाः असंच पाहिजे -- असंच पाहिजे --( असं म्हणत वळकटी घेऊन आत जातात. आतून --) तुम्ही उठलात की उठव गं माधुरी. मलाही हल्ली लौकर झोप लागत नाही -- आणि मग पहाटे डोळा लागतो.

अनघाः हं - झोपा तुम्ही. सावकाश उठलात तरी चालेल - याचीही रजाच आहे उद्या. ( अनिलला ) एवढ्या

अपमानानं निदान तुझा निद्रानाश तरी होईल अशी आशा आहे. अर्थात् अपमान झाला असला तर -- ( अनिल काही बोलत नाही.) हं काढा आता प्रेमाच्या आठवणी पुन्हा - लाजेनं गोठल्या नसल्या तर --

अनिलः तू बोलत राहा - ओकत राहा तुझा संताप -- मी ऐकत राहतो -- वाटलं तर मारून टाक मला. हरकत नाही --

अनघाः बाबांचं बोलणं इतकं मनावर घेतलंस वाटतं. अगदी जिवाचीही पर्वा राहिली नाही ती -- असू दे -- मी काढते आठवणी -- पहिली आठवण येतीय ती म्हणजे तू एकदा म्हणाला होतास की ' तुझ्यासाठी मी वाट्टेल ते करीन -- जीवसुध्दा देईन.'-- त्याची -- आणि मी तुझ्या तोंडावर हात ठेवला होता -- आणि तुझ्या मिठीत आले होते -- दुसरी आठवण म्हणजे पहिल्या रात्री उडालेल्या तुझ्या गडबडीची -- तिसरी लग्नाचा पहिला वाढदिवस आपण अगदी मिनिटामिनिटाचं प्लॅनिंग करून तुडुंब मजेत घालवला त्याची. चौथी दिवस गेल्याचं कन्फर्म होताच तू हर्षानं वेडा झालास त्याची - पाचवी तू बाळासाठी लोकरीच्या लड्या आणल्यास ती -- सहावी --

अनिलः नको अनघा - पुरे आता --

अनघाः आणि सहावी म्हणजे खरं तर पहिलीच्याही आधीची -- लग्न झाल्यावर बाबांच्या गळ्यात पडून मी खूप खूप रडले त्याची --( इथं पुन्हा हुंदके फुटतात... ) मी लहान असताना आई वारली...माझं लग्न झालं आणि बाबा पोरके झाले...आणि आता मी उद्ध्वस्त झाले...सगळीच फुटक्या नशिबाची होतो आम्ही....

अनिलः तू सगळं चांगलंही कुत्सितपणानं बोलतेयस --

अनघाः मग तू बोल -- बिन-कुत्सितपणानं --

अनिलः मी एकदा चॉकलेटस् आणली होती आणि एकेक चॉकलेट दोघांनी दोन्ही बाजूंनी खायला सुरुवात करून एकाच वेळी मधे संपवायचं असा खेळ आपण खेळत बसलो होतो, ते नाही आठवत तुला ?

अनघाः ओहो - ते आठवतंय तुला ! अं !

अनिलः हसतेयस तू -पण एकमेकांवरचं प्रेम नव्हतं ते ?

अनघाः हे प्रेम तर हातात सुरा धरूनही करता येतं. आता एवढ्यात तरी हे विसरून चालणार नाही तुला --

अनिलः ( सुस्कारून बसतो. डोकं खाली घालून हातात धरतो.) थकून गेलोय मी.

अनघाः हं -- आणि पायही दुखत असतील तुझे -- पोटात चार महिन्यांचं मूल आहे तुझ्या -- मला थकायचं कारणच नाही - कारण माझ्यात, हातात सुरा धरणाऱ्या माणसाची शक्ती जमा झालीय -

अनिलः मी नालायकच आहे ; पण तूही प्रतिकार केला नाहीस -- (डोकं झटकतो.)

अनघाः तू पळालास तेव्हाच खरं तर माझा प्रतिकार संपला होता. मी फक्त प्रतिकाराचं थोडं नाटक केलं, तेही मला थोडा स्वाभिमान होता म्हणून -- नंतर मात्र व्यवस्थित सगळं होऊ दिलं मी-- ( अनिल डोकं खाली घातलेला -- तसाच -- मूक हुंदके देऊ लागतो-- गदगदू लागतो. अनघा काही क्षण नुसती तटस्थपणे पाहते. मग नजर बाजूला करते.) वेळ निघून गेल्यानंतर काही उपयोग नाही. ती वेळ साधली असतीस तर असं बायकांसारखं रडायची पाळी आली नसती तुझ्यावर. जगला असतास तर मानानं जगला असतास आणि मेला असतास तरी मान राहिलाच असता. शक्ती कमी पडल्यानं पराभव होणं हा कधीच अपमान नसतो -- आधीच पराभव पत्करून पळ काढणं हा अपमान असतो. ( अनिलला तशीच पडल्या-पडल्या थकव्यानं ग्लानी आलेली असते...) झोपलास वाटतं ! आता तुझं जिवंत असणं म्हणजे जागं असणं किंवा झोपलेलं असणं - तोंड उघडं टाकून -- आ वासून ... आणि मी ... तुझी जिवंत बायको ..तुझ्या होणाऱ्या मुलाची आई ...( हमसू लागते...गळाठत जाते...अनघाचे हुंदके वाढत जातात. आवाज मोठा होत जातो. अनिल जागा होतो. आतून बाबा -- ' माधुरी - ए - माधुरी --' म्हणतात. रडण्याचा आवाज वाढतो तसे ते बाहेर येतात. अनिल अवाक् उभा. बाबा तिच्याजवळ जातात. पाठीवर हात ठेवून 'माधुरी SS' म्हणतात. ती वळते आणि त्यांच्या गळ्यात पडून हमसाहमशी रडत राहते. असे काही क्षण...मग अंधार...पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा - रंगभूमीवर अनिल आणि अनघा.)

अनघाः मघाशी मला वाटलं की तू आता बाबांना सगळं सांगणार -- माझ्या बेअब्रूचं जाऊ दे -- पण तो धक्का पेलला नसता त्यांना.

अनघाः शहाणा आहेस.

अनिलः उलट आपल्या भांडणात तू उगीच मला इतकं बोललीस --याचं तुला दुःख झाल्यानं तू रडत होतीस असं तू त्यांना सांगितलंस ते बरं झालं.

अनघाः ते आता खरं धरून न चालण्याइतकं डोकं ठिकाणावर राहू द्या आणि अपमानावर फुकर मारली असं समजू नका --

अनिलः मला तू काहीही बोल, कितीही जखमी कर,पण तुझ्या वृध्द वडिलांना याचं दुःख पोहोचू नये अशीच माझी इच्छा होती.

अनघाः तुझ्या इच्छेसाठी टाळलेलं नाही मी ते.

अनिलः तेही अर्थात समजतंय मला...एक आश्यर्च वाटतंय मला तुझं ...इतक्याही प्रसंगातून तू नीट सावरत चालली आहेस...तुझा संताप अगदी नीट अंमलात आणते आहेस...

अनघाः दुःखानं मी वेडी झाले असते म्हणजे तुझं आयुष्य सोपं झालं असतं.

अनिलः ...आणि...आणि मला असं वाटतंय की मीही थोडा थोडा सावरत चाललोय...( ती नुसती नजर उचलून पाहते आणि स्वस्थ बसते.) तू नुसती माझी हेटाळणीच करते आहेस. अजूनही या घटनेतून बाहेर पडून आपल्यात काही नातं निर्माण करायचा प्रयत्न करता आला असता. पण तुला तुझ्या दुखावलेल्या अपेक्षेचंच महत्त्व प्रचंड वाटतं आहे. मी मोठ्या शौर्यानं वागायला हवं होतं, ही तुझी दुखावलेली अपेक्षाच आपल्या नात्याचं संपूर्ण सार झाली आहे.

अनघाः तू सावरत चालला आहेस असं तुला वाटत असेल तर ते न बोलण्याइतका तरी स्वाभिमान दाखवलास तर बरं होईल...आणि ( कुत्सितपणे ) अपेक्षेशिवाय नातं निर्माण करायची एक नवी पध्दत आपण पाडू या आता --

अनिलः माझी तुझ्याकडून अशी अपेक्षा होती की, तू या शरमेच्या चिखलातून बाहेर यायला मला मदत करावीस आणि आपलं नातं अबाधित ठेवायचा प्रयत्न करावास. ( अनघा अत्यंत घाणेरड्या नजरेनं त्याच्याकडे पाहते.) तुझ्या दृष्टीनं तर नातंच संपलेलं दिसतंय.

अनघाः एवढंच समजायला पुरेसं डोकं असलं तरी बास आहे.

अनिलः ठीक आहे. तुझंच खरं...समज, आता मी असं म्हटलं की तू माझी बायको-- परपुरुषानं उपभोगलेली-- म्हणजे माझ्या अभिमानाच्या दृष्टीनं जिवंतही ठेवण्यालायक नाहीस. आणि या विचारानं मी तुझा खून करायला काही हरकत नाही. माझ्या हातून मरताना तुला आपल्या नात्यावरचा भित्रेपणाचा डाग धुतला गेला असं वाटेल की नाही ? याला तरी आता नाही म्हणू नकोस.( शांतता..) कदाचित् तुझंही जगणं तुला महत्त्वाचं वाटत असेल तर तसं सांगायला हरकत नाही.

अनघाः तुझी फक्त कीव येतेय मला. आणि केलास समजा तू माझा खून, तर पुढं न्यायालयात तुला ज्या अनेक प्रश्नांना तोंड द्यावं लागेल तेव्हा पुन्हा तू शेणामेणाचा होशील.

अनिलः ( जरा वेळ एकटक तिच्याकडे पाहून ) विचार प्रश्न.( हे तिला अगदीच अनपेक्षित. कसाबसा तोल सावरते. काही क्षण पाहात राहते. मग पाहातच निश्चयानं उठते. समोर येते. तो आहे तिथे उभा. शांतता.)

अनघाः ( एखाद्या वकिलाच्या निग्रहानं ) नावं काय तुमचं ?

अनिलः अनिल हणमंत नाईक.

अनघाः वय ?

अनिलः एकोणतीस.

अनघाः शिक्षण ?

अनिलः एम..ए.

अनघाः धंदा.

अनिलः मूळचंद मिल्समध्ये कारकून.

अनघाः तुमच्या बायकोचं नाव काय होतं ?

अनिलः अनघा.

अनघाः म्हणजे लग्नात तुम्ही ठेवलेलं ?

अनिलः होय. तिचं पूर्वाश्रमीचं नाव माधुरी होतं.

अनघाः अनघा या शब्दाचा अर्थ काय ?

अनिलः निष्पाप स्त्री.

अनघाः तुम्हाला ती तशी वाटत होती ? निष्पाप ?

अनिलः वाटतही असेल...पण त्यात बहुतेक तशा अपेक्षेचाही भाग होता. आणि हे नाव मी केवळ अर्थाकडे लक्ष देऊनच ठेवलं असं नाही. थोडं नावीन्य -- ही अक्षरं -- आणि ही अक्षररचना हीही मला आवडली असतील. शिवाय नाव म्हणायला सोपं-सुटसुटीत. बायको नवऱ्याला सोपी-सहज असावी.

अनघाः बरं, तिचा खून झाला हे खरं आहे का ?

अनिलः होय.

अनघाः कुणी केला खून ?

अनिलः मीच.

अनघाः का खून केलात तुम्ही तिचा ?

अनिलः एकदा आम्ही फिरायला गेलो होतो. फिरत फिरत आम्ही खूप लांब एका निर्मनुष्य ठिकाणी गेलो. तिथं अचानक एक सुराधारी माणूस आला...मी भीतीनं त्याला प्रतिकार करू शकलो नाही...त्यानं तिच्यावर बलात्कार केला... त्याचा खरा उद्देश वाटमारीचा होता आणि तिला पाहून त्याला ऐनवेळी ही इच्छा झाली वगैरे अप्रस्तुत आहे म्हणून ते सोडून देऊ...तर मुख्य म्हणजे त्यानंतर मला असं वाटलं की, आता ही माझी बायको राहू शकत नाही...आणि माझी बायको नसून तिनं जिवंत राहणं हे मला अपमानास्पद वाटलं...म्हणून...अर्थातच..मी...तिचा...खून केला.

अनघाः तुमच्या देखत दुसऱ्या पुरुषानं तिला ओढणं आणि नंतर बलात्कार करणं हे तुम्हाला कस वाटलं ?

अनिलः हेही अपमानास्पदच वाटलं.

अनघाः मग तुम्ही आत्महत्या का केली नाहीत ? खून का केलात ?

अनिलः मी माझ्या जिवंत राहण्याला महत्त्व देणारा माणूस आहे. आणि तिचा खून करण्यानं मी माझ्या अपमानित अवस्थेतून थोडा सावरू शकेन असं मला वाटलं.

अनघाः नंतर कायदा तुम्हाला फासावर चढवील ही शक्यता तुमच्या मनात आली नाही ?

अनिलः माझं जिवंत राहणं जास्तीत जास्त ताणून धरण्याचा तो मी शेवटचा बिंदू मानला. त्याशिवाय गत्यंतरच नव्हतं.

अनघाः म्हणजे, तुमच्या दुबळेपणामुळंच तिच्यावर बलात्कार झाला आणि तुमच्या दुबळेपणामुळंच तिला प्राणाला मुकावं लागलं.

अनिलः दोन्ही वाक्यं शंकास्पद आहेत. दुसरं तर जास्तच. तिचा खून करताना मला दुबळेपणा जाणवला नाही. उलट माझ्यातल्याही शक्तीची मला जाणीव झाली.

अनघाः अशा वृत्तीतून जर समाजातली सगळी नाती घडतील तर ती शुध्द बेशरमपणाची आणि सर्वांनाच सतत धोक्याची राहतील, हे समजतं का तुम्हाला ?

अनिलः समजतं. आणि दुर्दैवानं समाजातली सगळी नाती अशीच आहेत असं मला वाटतं.

अनघाः तुमच्या जागी दुसरा एखादा असता तर त्यानं स्वतःच्या प्राणाचीही पर्वा केली नसती. आपल्या सर्वस्वानं प्रसंगाला तोंड दिलं असतं, ही शक्यता पटत नाही तुम्हाला ?

अनिलः याचा अर्थ इतकाच की, नात्याचं आहे ते धरून चाललेलं स्वरूप तो शेवटपर्यंत संगतवार राखू शकला असता. मी ते तसं राखू शकलो नाही हा माझा कमकुवतपणा असेल..किंवा खरं म्हणजे अधिक शहाणपणाही असेल.

अनघाः म्हणजे तुम्हाला कसलाच पश्चात्तापही होत नाही आहे ?

अनिलः विनाकारणच मनावर जमलेल्या पश्चात्तापाच्या ताणांतून आता मी हळूहळू मोकळा होतो आहे. याला मला तुमची मदत होते आहे. याबद्दल मी तुमचा आभारी आहे. कायद्याचा आभारी आहे. आणि त्याची जपणूक करण्यासाठी झटणाऱ्या न्यायालयाचाही मी आभारी आहे. इथं माझा मलाच न्याय मिळायला मदत होते आहे.

अनघाः पण या न्यायालयाचा अंतिम निकाल म्हणजे तुम्हाला अत्यंत महत्त्वाच्या वाटणाऱ्या तुमच्या जिवंतपणाचा अंत असेल हे निश्चित समजून राहा.

अनिलः मी तुम्हाला मघाशीच सांगितलं की तो मी शेवटचा बिंदू मानलेला आहे.

अनघाः का पण ? तोच का तुम्ही शेवटचा बिंदू मानलात ? तिचा खून न करता आणखीही खूप जगत राहू शकला असतात तुम्ही.

अनिलः कायम संपूर्ण अपमानित जगण्यापेक्षा त्या अपमानातून बाहेर पडायची पहिली संधी मी घेतली.

अनघाः म्हणजे तुमचं सगळं वागणं हे केवळ त्या त्या वेळी तुम्हाला सोयीस्कर वाटणाऱ्या विचारांवर आधारलेलं आहे.

अनिलः सगळ्यांचं तसंच असतं. प्रत्येकाचा सोयीस्करपणा वेगवेगळा असतो म्हणूनच वागण्याच्या तऱ्हा वेगवेगळ्या असतात.एका माणसाच्याही तऱ्हा वेगवेगळ्या असू शकतात. पण मुळात सगळा सोयीस्करपणाच. म्हणूनच घडलेली बलात्काराची घटना जर दुसऱ्या कुठल्या तरी वेळी वा दिवशी घडली असती तर कदाचित मी याहून वेगळा वागलो असतो. पण प्रत्यक्ष त्या वेळी तसा वागलो हे खरंच आहे. आणि आपण जे जे प्रत्यक्ष वागतो त्याच्या परिणामांमधून जावं लागतंच आपल्याला.

अनघाः म्हणजे सगळी नाती, सगळ्या घटना, एकमेकांसाठी केलेले त्याग, हे सगळं निरर्थक वाटतं तुम्हाला ?

अनिलः आता तसंच वाटतं आहे.

अनघाः तुमचं तुमच्या बायकोवर प्रेम होतं ?

अनिलः होय,होतं.

अनघाः तुमचं तुमच्या बायकोवर प्रेम होतं -- या वाक्याचं स्पष्टीकरण तुम्ही कसं कराल ?

अनिलः ती मला आवडत होती. तिचा सहवास मला हवाहवासा वाटत होता. तिला जवळ घेतलं की, मी बेहोष व्हायचो. तिला माझ्यापासून दिवसही गेले होते--सुमारे चार महिने. एकमेकांच्या सुखदुःखांची काळजी घ्यायला आम्हाला आवडत होतं.

अनघाः त्यालाही काही अर्थ नव्हता !

अनिलः आता तसंच वाटतं आहे.

अनघाः म्हणजे उद्या कदाचित् वेगळं वाटेल ?

अनिलः नाही, ती शक्यता नाही; कारण एकदा भ्रमनिरास झाल्यानंतर पुन्हा भ्रमात जाता येणार नाही.

अनघाः तुमचा भ्रमनिरास झाला आहे असा फक्त एक नवा भ्रम तुम्ही स्वीकारलेला आहे.

अनिलः सोयीस्करपणा !

अनघाः म्हणजे बदल शक्य आहे --

अनिलः सोयीस्करपणाच्या पराकोटीच्या अवस्थेत मी आता पोचलेलो आहे. म्हणूनच माफक सोयीस्करपणाच्या या जगात मी गुन्हेगार ठरणार आहे.

अनघाः म्हणजे न्यायालय, न्याय, प्रायश्चित्त, शिक्षा या सगळ्या गोष्टींची तुम्ही टर उडवताहात.

अनिलः न्यायालयानं मला फाशी देणं आणि मी माझ्या बायकोचा खून करणं यात मला तरी काही फरक दिसत नाही. तिचा जो नाइलाज झाला तो आता माझा होईल इतकंच । ( इथे ती ढासळते,गळाठते, हमसू लागते.)

अनघाः म्हणजे खरंच खून करणार आहेस तू माझा...खरंच खून करणार आहेस...?... म्हणजे आणखी एक...शेवटचा...बलात्कार...( थरथरत राहते )

अनिलः म्हणजे आता तू स्वतः शेणामेणाची होतेयस असं दिसतंय...( काही क्षण...आता लांबून कामगार वस्तीतून भजनाच्या ओळी ऐकू येतात --
सुखदेव म्हणतो, अरे भगवंता
जागा द्या चरणी SSS...
... भजन हळूहळू अस्पष्ट होत जाते... )

अनघाः ( अत्यंत थकून...स्वतःच्या दयेनं...कातर आवाजात ) ... नको रे छळ करूस असा... नको छळ करूस... आईशिवाय वाढलेय मी लहानपणापासून...बाबांचं आयुष्य फार दुःखात गेलंय...नुसतं चांगलं जगायचं होतं मला...नुसतं चांगलं जगायचं होतं...काय वाईट केलंय मी कुणाचं...माझ्या मनाचा थोडा तरी विचार कर की...

अनिलः बरीच रात्र झालीय...तुला झोपायचं असेल तर झोप...

अनघाः म्हणजे खरंच खून करणार तू माझा ...

अनिलः जास्त मोठा आवाज होऊ देऊ नकोस... पुन्हा बाबा बाहेर आले तर जुन्या आठवणींचा प्रसंग येईल...( ती नुसतीच गदगदत राहते. तो जवळ येतो, पाहतो. मग--)नाही. मी खून नाही करणार तुझा.( ती सावकाश वळून पाहते.) त्याऐवजी तू आत्महत्या करावीस असं मला वाटतं. कारण तुझा मृत्यू होणारच आहे तर तो असा आत्महत्येनं झाल्यानं आपलं नातं माझ्या मनात जिवंत राहू शकेल. मी भित्रा असलो

तरी माझ्यावर तुझं इतकं नितांत प्रेम होतं -- आणि माझ्याशीच संपूर्ण बांधलेलं राहण्याची तुझी इतकी संपूर्ण इच्छा होती की, तू या घटनेनंतर आत्महत्याच केलीस -- या गोष्टीनं माझा अभिमान शाबूत राहायला खूप मदत होऊ शकेल. आणि तुझ्या दृष्टीनं एखाद्या व्यक्तीच्या मृत्यूपेक्षा दुसऱ्याच्या मनात का होईना, पण नातं अबाधित जिवंत राहणं महत्त्वाचं आहे. तीही तुझी इच्छा सफल होईल. शिवाय मरताना माझ्यासाठी त्याग केल्याचं तुला समाधान मिळेल.

अनघाः ...मी...मी हाच निर्णय घेणार होते...स्वतःहून ...पण...पण आता नाही...आता नाही मला आत्महत्या करता येणार...

अनिलः का ?

अनघाः मी मानलेल्या गोष्टी या फक्त मानलेल्याच आहेत याची जाणीव ठेवून वागणार आहेस तू... हे कळलंय मला...मला माझी आत्महत्या जशी वाटायला हवी होती तशी वाटणारच नाहीय ती तुला...त्या गोष्टी मानून आता मला वागता येणार नाही. माझ्या आत्महत्येनंतर तुझा अभिमान शाबूत राहिला असता तर चाललं असतं मला...पण मी मानलेल्या गोष्टी तशा न राहता हे होणं...म्हणजे माझ्या आत्महत्येला काही किंमतच राहणार नाही....

अनिलः मला वाटतं सगळ्या गोष्टींच्या किंमती आता आपल्या ध्यानात आलेल्या आहेत...

अनघाः खूप बोललो आपण...उगीच बोललो...उगीच...त्यापेक्षा मी आधीच आत्महत्या केली असती तर बरं झालं असतं...निदान माझ्या त्या शेवटच्या कृत्याची अपेक्षित बूज राहील या समाधानात तरी मला मरता आलं असतं. आता सगळेच मार्ग बंद झाले आहेत.

अनिलः आणि आता मी तुला अगदी स्वच्छपणानं आणि संपूर्ण मोकळेपणानं सांगू शकतो की आता मला कसलीही शरम वाटेनाशी झाली आहे...शरमेच्या चिखलातून मी बाहेर आलो आहे...या गोष्टीला मला तुझी फार मदत झालेली आहे...तुझ्याही नकळत तू माझी आपल्या नात्यातली अपेक्षा पूर्ण केली आहेस...तुझ्याबद्दल मला पुन्हा आपुलकी वाटायला लागली आहे... मघाशी मला तुझी भीती वाटत होती...आता मला तुझी भीती वाटत नाही...

अनघाः मला थंडी वाजते आहे. जरा स्वेटर देतोस ? ( अनिल तिच्याकडे सरळ पाहतो. मग उठतो आणि तिला स्वेटर आणून देतो.)

अनिलः ( ती स्वेटर घालत असताना ) खरंच मला तू अगदी माझी वाटायला लागली आहेस...तू अजिबात आत्महत्या करू नयेस असं आता मला वाटतं आहे...पण या घटनेनंतर जगणं तुला अशक्यच वाटत असेल तर तुझ्या आत्महत्येची तुला अपेक्षित तीच बूज माझ्याकडून राखली जाण्याच्या मनःस्थितीत मी आलो आहे -- हे तुला सांगणं मी माझं कर्तव्य समजतो.कदाचित् पुन्हा जर तुझ्यावर बलात्काराचा प्रयत्न झाला तर मी काहीही विचार न करता निर्भयपणे प्रतिकार करीन. तेव्हा तुला आता आत्महत्या करायलाही हरकत नाही. कारण तुझ्या त्या समाधानासाठी मी आता तुझा त्यागही करायला तयार झालो आहे. म्हणूनच तू आत्महत्या करू नयेस अशी माझी इच्छा आहे.

अनघाः म्हणजे आता आपोआपच जसं सगळं असायला हवं तसं झालं आहे...जसं असायला हवं तसंच...( अनिल तिच्याकडे पाहतो,तिच्याजवळ जातो, पाहात राहतो, तिच्या गालावरच्या ओरखड्यावरून हळुवार बोट फिरवतो...ती एकदम उमाळ्यानं त्याला आलिंगन देते...प्रेक्षकांना ती पाठमोरी. अनिलचा चेहरा समोर )... घडलेली घटना विसरून जाऊ या आपण... विसरून जाऊ या...

अनिलः ( तटस्थपणे ) विसरता तर काहीच येत नसतं...अशी घटना तर नाहीच...पण आपल्या नात्याची नव्यानं सुरुवात करता येईल आपल्याला...

अनघाः जे जसं असायला हवं तसंच घडून आलं आहे. अगदी... जसं हवं तसंच...मी बाबांना यातलं काही बोलले नाही ते बरं झालं... या घटनेच्या दडपणातून बाहेर पडता येईल आपल्याला...पण त्यांना ते कधीही शक्य झालं नसतं...

अनिलः रात्र खूप झालीय...

अनघाः दोन वाजून गेले असतील...तू झोप...झोप येत असली तर ...

अनिलः छे - झोप पूर्ण उडालीय माझी ...उलट ताजं ताजं वाटायला लागलंय... काहीच न कळण्यात एक ताजेपणा असतो...असं वाटतंय की, पहिल्यांदाच भेट होतेय -- दृष्टादृष्ट होतेय आपली. आणि माझ्या मनात प्रेमभावना जागृत होतेय... असं वाटतंय की कदाचित आपण पुन्हा एकदा प्रेमविवाह करू...

अनघाः एवढं सगळं होतंय...पण ही घटना पूर्णपणे पुसून टाकता आली असती तर बरं झालं असतं...मला अजूनही कमीपणा वाटतोय...माझं सर्वस्व नष्ट झाल्यासारखं रिकामं रिकामं वाटतंय...आणि आपलं नातं पुन्हा कसं सांधलं जातंय याचं आश्चर्यही वाटतंय...आपल्याच नशिबी का आली ही घटना ?

अनिलः काय घडावं आणि काय घडू नये, याला फारसं महत्त्वच नाही असं वाटतंय मला. आपल्याला काहीही कळत नाही हे सर्वात महत्त्वाचं आहे...

अनघाः या घटनेतून शक्ती मिळत चाललीय तुला...आणि माझी सगळी शक्तीच हरवलीय...मला धड उभंही राहता येणार नाही, अशी कोसळून गेलेय मी...माझ्याकडून कसल्याही मदतीची आवश्यकता राहिलेली नाही तुला...उलट तुझाच आधार हवाय मला...

अनिलः या घटनेनंही तू ढासळली नाहीस, इतकी खुनाच्या कल्पनेला घाबरलीस तू...

अनघाः नाही रे...असं नको म्हणूस...तू संपून गेलायस असं वाटत होतं मला...आणि म्हणून तुझ्या हातून मरणं हे अगदीच अपमानास्पद वाटत होतं मला...पण आता...आता नाही तसं वाटत...तू माझं खरंच काहीही कर...पुन्हा मनानं मी सर्वस्वी तुझ्यावर अवलंबून राहू शकेन.. तू करशील ते मान्य आहे मला... सगळं पुन्हा जागच्या जागी आलं आहे..जसं हवं होतं तसं झालं आहे...

अनिलः हं --

अनघाः सिगरेटचं पाकीट देऊ तुझं ?

अनिलः नको --

अनघा : खरं म्हणजे सिगरेट बंदच करायला हवीस तू आता... नाहीतरी सिगरेट ओढायचं तुझं प्रमाण वाढतच चाललं होतं...सिगरेटच्या वासानं फार मळमळतं मला... पण तू काही ऐकत नाहीस...( जवळ जात ) ...होय की नाही ? ...

अनिलः हं --

अनघाः नाही सोडलीस तरी चालेल...आता सवय झालीच आहे की मला...

अनिलः ...आता झालं ते घडून गेलंच आहे..पण त्यातही एक जमेची बाजू आहे...आधीच तुझ्या पोटात गर्भ असल्यामुळं याचा तसा महत्त्वाचा परिणाम व्हायची शक्यता नाही...

अनघाः आता पुन्हा मला तुझा तिरस्कार वाटेल असं नको ना बोलूस --

अनिलः नाही -- मला असं म्हणायचं होतं की, नकळत माझ्याकडून तुझ्या रक्षणाची व्यवस्था झालेलीच होती... आणि कुठल्याही बोलण्याचं आता फारसं काही वाटायचं खरं तर कारण नाही...प्रत्यक्ष घडलेल्या घटनेहून शब्द अधिक घाणेरडे कसे असतील ? -- हीच घटना रिकाम्या गर्भाशयावर घडली असती तर अधिक भयानक ठरली असती...अर्थात् त्याही परिणामातून मुक्तता करून घेता आली असती म्हणा...

अनघाः नाही नाही -- इतकं क्रूरपणानं बोलू नकोस... मी शेवटपर्यंत फक्त तुझीच राह्यला हवी होते...माझ्या शरीराच्या बाबतीत माझ्या अपेक्षेला तडा गेलाच आहे... त्या जखमेची तीव्रता अशी कमी-जास्त होणार नाही...पण आता कशाला ते...आता पुन्हा बोलणं म्हणजे छळच होणार फक्त एकमेकांचा...मी तर अगदी हतबल झाले आहे. मला आता विश्रांती हवी आहे...

अनिलः म्हणजे त्या माणसामुळं विश्रांतीची भीक मागण्यापर्यंत पाळी आली तुला...प्रत्यक्ष घटनेनंतरही त्याची कृती थकवत राहिली तुला. त्याच्या कृतीच्या प्रत्यक्ष मर्यादेपेक्षा जास्त अंगावर घेतली गेली ती तुझ्याकडून...

अनघाः प्रत्येक गोष्ट ओरबाडून, खरवडून, उघडी करून पाहतोयस तू... मला झेपत नाहीय हे...खरंच, माझा विचार कर जरा... मी अगदी भीक मागते तुझ्याकडे...

अनिलः तू जितकी जास्त ढासळशील तितका जास्त तू माझा अपमान करणार आहेस हेही लक्षात घे...अर्थात् मला आता तो कितपत अपमान वाटेल हे वेगळं आहे...पण तुझ्या वागण्याचा परिणाम एरवी तोच झाला असता...

अनघाः खोटा धाडसीपणा किंवा खोटा समजुतदारपणा कसा आणता येईल मला ? मला मी आहे अशीच तू समजून घ्यायला नकोस का ?

अनिलः म्हणजे काही तासांपूर्वी मी जे माझ्याबद्दल बोललो असतो ते तू आता तुझ्याबद्दल बोलते आहेस...( इथे आतून बाबांचा झोपेत कण्हत असल्यासारखा आवाज येतो.)... झोपेत कण्हतायत बाबा...छान झोप लागलीय त्यांना...म्हणूनच आयुष्याचा शीण बाहेर पडतोय त्यांच्या आवाजातून...

अनघाः ते आले हे बरं झालं एका दृष्टीनं...आपोआपच ताबा ठेवावा लागला मला स्वतःवर...नाहीतर मी माझ्या

दुःखातच वाहवत गेले असते...

अनिलः असं असेल तर खरंच बरं आहे...पण मला मात्र त्यांचा राग येत होता...अडथळा वाटत होता त्यांचा...

अनघाः उगीचच घडलं सगळं...का घडलं याचा विचार करून काही उपयोगच नाही...( बाहेरून लांबून एक कुत्रं भुंकल्याचा आवाज येतो. त्याच्यामुळं मग दुसरं एक कुत्रं भुंकू लागतं. मग पुन्हा हळूहळू शांतता...)

अनघाः मी स्त्री आहे हा काही माझा गुन्हा नाही...( ती हे सगळं बोलत असताना अनिल स्वस्थ तटस्थ बसून...)...मी स्त्री नसते तर बरं झालं असतं असं म्हणून तरी काय उपयोग आहे ?... असंच असणार होतं हे सगळं... आपला प्रेमविवाह व्हायचाच होता...किती सुरक्षित, सुखाचं समजत होतो आपण आयुष्य... आयुष्य असं राहूच शकत नसेल कदाचित्...बंद होऊन एखाद्या ऊबदार कप्प्यात...अशा वेळी असा कुठं तरी स्फोट होणं अटळच असेल कदाचित...अटळच असेल...पाय जड झालेत माझे...डोकं बधिर होत चाललंय...डोळे दुखायला लागलेत...( डोकं टेकते..)... मला सहन होत नाहीय आता काहीच...जणू शेवटची झोप लागणार आहे मला ...शांत...( ती पडून, अनिल बसलेला...काही क्षण शांतता...अनिल उठतो, तिच्या अंगावर पांघरूण टाकतो आणि पुन्हा जाऊन बसतो...स्वस्थ...प्रकाश कमी कमी होत जातो...मग रंगीत प्रकाश येतो...स्वप्नदृष्य...अनिलच्या मांडीवर डोकं ठेवून अनघा...लहान मुलासारखी ...)

अनिलः कशी होती गोष्ट ? तुपात पडली माशी चांदोबा राहिला उपाशी ...तुपात पडली माशी...

अनघाः अशी नको...तुपात माशी नको ना पडायला, जेवू द्या ना चांदोबाला...

अनिलः ( हसून ) बरं, तुपात माशी पडली नाही, चांदोबा उपाशी राहिला नाही...तुपात माशी पडली नाही. चांदोबा उपाशी राहिला नाही...( दोघंही हसतात...) आज काय गंमत आणलीय मी आमच्या संतोषला...काय काय काय...पतंग ! पतंग आणि मांजा ! उंच ! खूप उंच उडवायचा आपण पतंग ! ...अगदी चांदोबापर्यंत...हं...आता उभा राहा पाहू ...हं उभा राहा...( अनघा उभी राहते...) वा, वा,वा... संतोष उभा राहिला, आम्ही नाही पाहिला...संतोष उभा राहिला...आम्ही नाही पाहिला...हं...आता चाल चाल करा बघू...हं...चला...( अनघा हसत हळूहळू एकेक पाऊल टाकते...अनिल हसत टाळ्या वाजवत राहतो...) वा, वा, वा ... ( मधेच अनघा पडू लागते तेव्हा अनिल तिला सावरतो...जवळ येतो...मग बाजूला होत...) तुरुंगातून फक्त थोड्या वेळासाठी सोडलंय मला...आता जायला हवं मला...

अनघाः मी तुझं खरं नाव सांगते त्यांना...म्हणजे तुला सोडतील ते...तुझ्यावर विश्वास बसला नसेल त्यांचा...

अनिलः नको --

अनघाः असं काय ते ? सांगते ना --

अनिलः बरं सांग -- ( बाबा येतात... त्यांच्या ओंजळीत फुलं आहेत...)

बाबाः हं...मुलांनो, ही घ्या फुलं...आणि संतोष कुठं दिसत नाही तो...लपून बसलाय वाटतं गुलाम...थांबा हं. मी काढतो शोधून त्याला...( शोधत शोधत आत जातात...)

अनिलः बाबांच्या तर गाडीला अपघात झालाय...ते इथं कसं आले ?

अनघाः नाही नाही...ते त्या गाडीत नव्हतेच...

अनिलः त्याच गाडीत होते ते...मी पाहून आलोय...आता कधीच येणार नाहीत ते इथं...तुरुंगातच कळलं होतं मला..

अनघाः नाही...असं नसेल...

अनिलः अगं असंच आहे ...

अनघाः ( प्रचंड ओरडते ) नाही, नाही, नाही-- ( रंगीत प्रकाश जातो. अनघा आहे तिथे झोपलेली...अनिल आहे तिथे स्वस्थ बसलेला...)

अनघाः ( प्रचंड ओरडत जागी होते ---) नाही,नाही,नाही...( घाबरलेली...)

अनिलः काय झालं ?

अनघाः ( स्वतः जागी झाल्याचे लक्षात येत ) ...नाही...काही नाही...स्वप्न...स्वप्न होतं...

अनिलः हं --

अनघाः तू झोपलाच नाहीस वाटतं...माझा डोळा लागला तेवढ्यात...इतकी घाबरले मी...पण स्वप्न होतं...

अनिलः ते ठीक आहे...पण एक गोष्ट मला अजून खटकतेय...मघाशी तू म्हणालीस की तू त्याला प्रतिकार केला नाहीस ...?

अनघाः ( त्या प्रश्नानं संपूर्ण हादरून आवंढा गिळून -- ) म्हणजे...म्हणजे आता पुन्हा सुरुवात करायची ? आता माझ्यावरच्या तुझ्या हक्काला बाध आल्यासारख्या भूमिकेतून पुन्हा सुरुवात करू नकोस...आता मला हे फार सहन होणार नाही...

अनिलः तू सामील झाली होतीस ?

अनघाः नाही, नाही, नाही...ते मी माझ्या संतापाच्या भरात म्हणाले होते...

अनिलः आणि आता ' नाही ' म्हणते आहेस, कारण पुन्हा सगळं सांधून घ्यायचं आहे ?

अनघाः नाही ; मी खरं बोलते आहे.

अनिलः म्हणजे प्रत्यक्षात काय घडलं हे मला कळायला काहीच मार्ग नाही.

अनघाः पण विश्वास ठेव नं तू माझ्यावर ...एकमेकांवर विश्वास टाकायला नको का आपण ?

अनिलः विश्वास का टाकायचा तर आपल्याला नातं टिकवायची इच्छा आहे म्हणून ! म्हणजे आपली इच्छा काय आहे हेच या सगळ्यात शेवटी खरं महत्त्वाचं ! विश्वास, अविश्वास, खरं, खोटं, घटनांचे तपशील --या गोष्टींना तसा काही अर्थ नाहीच !

अनघाः हे टिकवायच्या इच्छेमुळं तू विश्वास टाकतो आहेस असं म्हण हवं तर... पण आता विश्वास टाकला आहे असं तरी म्हण...

अनिलः मग प्रत्यक्षात काहीही घडलं तरी नातं टिकवायच्या आपल्या इच्छेमुळं आपला विश्वास अबाधित राहायला काहीच हरकत नाही...

अनघाः ठीक आहे...कबूल आहे मला...

अनिलः मग मघाशी तू माझ्यावर ' भ्याड ', ' नपुंसक ', 'लुळापांगळा','शेणामेणाचा','कणाहीन','स्वत्वहीन', 'बेशरम' वगैरे वगैरे शिक्के कशाला मारलेस ?

अनघाः माझी चूक झाली ती...मी माझी ती सगळी वाक्यं परत घेते...ती उच्चारल्याबद्दल तुझी क्षमा मागते...
( आता अनिल तिच्याकडे पाहतो आणि थोडा रिलॅक्स होतो...)

अनिलः ( नुसता एकटक तिच्याकडे पाहतो आहे...दृष्टी न हलवता --) तुझ्या अंगावर जी साडी आहे नं ती काल मी ऑफीसातून येताना विकत आणली...

अनघाः या कपड्यांमुळे जर या आठवणी पुन्हा पुन्हा उकरल्या जाणार असतील तर मी हे कपडे वापरणार नाही पुन्हा --

अनिलः वापरण्याचं जाऊ दे -- पण ती साडी मी तुला आणली असं आता वाटतच नाहीय मला -- ती साडी आणणारा तो मी आता मी राहिलेलो नाही...संपूर्ण बदललोय मी.

अनघाः आता थांबवू या नं हे आपण...जेवढं चांगलं निष्पन्न व्हायचं तेवढं झालं आहे...पुन्हा आणखी हे सगळं कुठं जाईल कुणाला ठाऊक..

अनिलः अजून नेमकं काय निप्पन्न झालय ते मला कळलेलं नाही...तेच समजून घ्यायचा प्रयत्न करतोय मी...तर इतका हा असा बदललेला मी...तू ज्याला तुझा नवरा मानलंस तसा न राहिलेला हा मी...अजूनही मला तू तुझा नवराच म्हणणार ? या प्रश्नाचं उत्तर द्यावंच लागेल तुला. कारण हे नातं नेमकं कसं राहणार आहे ते मी पुरतं समजून घेणार आहे ...आता यात कोणताही धोका पत्करायची माझी तयारी नाही.

अनघाः होय -- माझा नवराच आहेस तू... तू बदलला असलास तरी पूर्वीच्या सगळ्या आठवणी तुझ्यात आहेत. तू तोच आहेस...आता फक्त स्वरूप बदललं असेल...शिवाय तुझं शरीर तेच आहे...

अनिलः हे ...हे ठीक आहे. आणि आता आणखी एकच पण फार महत्त्वाचा प्रश्न उरला आहे...आपल्याला नातं टिकवायची इच्छा आहे म्हणून आपण एकमेकांवर विश्वास टाकायचा आणि इतर सर्व गोष्टी दुर्लक्षित करायच्या...आपल्यातले बदलही लक्षात घ्यायची जरूर नाही...हे सगळं ठीक आहे -- पण आपण मुळात हे नातं टिकवून धरायची इच्छाच कशाला करायची ?

अनघाः कुठलंही नातं टिकायला ही इच्छा लागणारच. त्याशिवाय ते प्रस्थापितच होणार नाही.

अनिलः पण नातं प्रस्थापित तरी कशाला व्हायला हवंय ?

अनघाः संघर्षाशिवाय राहता यावं...एकमेकांपासून सुख-समाधान मिळावं-- एकमेकांच्या सहवासानं आयुष्य पूर्ण व्हावं -- यासाठी...

अनिलः म्हणजे शेवटी याच्या मुळाशी एकमेकांपासून एकमेकांना मिळणारं सुख-समाधान आणि आधार हेच आहे ! म्हणजे या अपेक्षांना बाध आला की धोका आलाच ! मला आता असली नाती नको आहेत...

अनघाः पण जन्माला येणाऱ्या नव्या माणसासाठी तरी आपल्याला हे टिकवायला नको का ?

अनिलः कुठलीही गोष्ट आपण दुसऱ्या कुणासाठी तरी टिकवतो यावर माझा आता विश्वास राहिलेला नाही...यातलं सत्य आता मला स्वच्छ दिसायला लागलंय...आणि मी माझ्यातूनच सुटत चाललोय. सगळी प्रस्थापित नाती ढासळून पडताहेत माझ्यातली...सगळ्या टिकाऊपणातून मी मोकळा होत चाललोय...

अनघाः म्हणजे... म्हणजे...( रडायला लागते. मोठ्यांदा रडू लागते. सर्वांग हिंदकळत रडू लागते...अनिल तटस्थ...)...त्यापेक्षा तू मला पहिल्यांदा होतास तसा चालला असतास...तसाच चालला असतास...पण...आता ... ( पुढे बोलवत नाही - काही क्षण...अनघा उठते आणि दाराकडे चालत निघते.)

अनिलः अनघा -- ( ती वाजवीपेक्षा फारच जास्त दचकून थांबते.) --कुठं निघालीस ?

अनघाः ( प्रचंड घाबरून भरभर चालत येऊन मूळ ठिकाणी बसत --) नाही - कुठं नाही. ( थरथरत राहते ).

अनिलः थरथरतेयस तू --

अनघाः नाही -- कुठं --( थरथरणं थांबवायचा प्रचंड प्रयत्न करते. पण यशस्वी होत नाही.)

अनिलः असं काय करतेस अनघा -- तुला बरं वाटत नाही का ?

अनघाः नाही - वाटतंय की -- बरं वाटतंय --( घाबरलेलीच ) बरं वाटतंय...( अनिल जवळ येतो. तिच्या पाठीवर हात ठेवतो. ती प्रचंड दचकते. त्याच्या स्पर्शालाही घाबरून आक्रसते...) काही नाही...काही...नाही...बरं वाटतंय मला...बरं वाटतंय...

अनिलः वेडी होशील तू अनघा अशानं...असं वेड्यासारखं करू नकोस...थकलीयस तू...झोप स्वस्थ...

अनघाः ( लगेच झोपायला लागत --) -- हो -- झोपते की -- झोपते ...

अनिलः अनघा, कसलीही भीती बाळगू नकोस... मी दुरावणार नाही तुला...

अनघाः ...हं..हं हं हं हं हं ....

अनिलः तुझ्याजवळ बसू का अनघा ?

अनघाः नको...( उठून बसत --) नको...( पुन्हा पडत...) नको...झोपते मी ...

अनिलः माझ्या बोलण्याचा त्रास झाला का अनघा तुला ? ...आपण जर बोललो नसतो तर पुन्हा नवराबायको राहू शकलो असतो का आपण ? आपल्याला दोघांनाही वेड लागायची पाळी आली असती की नाही ?

अनघाः ( संपूर्ण आधीन झाल्यासारखी ) हं...हं...हं हं हं हं हं हं हं ...

अनिलः झोप तू आता...

अनघाः ( अती अस्वस्थपणे झटकन उठत ) ...नाही...झोप येत नाहीय मला...( लगबगीनं दाराकडे निघत...कपड्यांचं भान नाही...)... आलेच...डॉक्टरांनी मला एक औषध आणायला सांगितलंय...ते घेऊन येते..

अनिलः अगं, कुठलं औषध अनघा ? त्यांनी सांगितलेली औषधं आणलेली नाहीत का मी ?असं काय करतेयस ? आणि आता पहाटेचे चार वाजताहेत ...( तिची अवस्था अर्थातच अनिलच्या लक्षात आलेली आहे, परंतु डिस्टर्ब न होता तो हळुवार, समजुतदार...त्याचं बोलणं संपायच्या आतच अनघा ' होय -होय -- मला वाटलं .. '. असं म्हणत पुन्हा येऊन बसते. त्याआधी ठेचकाळते.) अशी धावपळ करून चालणार नाही तुला अनघा...अं...पडलीस म्हणजे...( अनघा अतिसमजुतदारपणाने मान हलवते...) बरं ते असू दे...मी काय म्हणतोय ते ऐक ..

अनघाः ऐकते की --

अनिलः हे बघ, ते सगळं विसर आता.. मी तर डोक्यातून पार काढून टाकलंय ते ...आठवण म्हणूनसुध्दा त्या गोष्टीची किंमत ठेवायची काही आवश्यकता नाही...कळतंय का तुला ?

अनघाः हं -- हो -- कळतंय --

अनिलः उद्याची तर रजाच आहे माझी..बाबाही आलेले आहेत..गप्पा मारत बसू आणि काहीतरी झकास बेत कर उद्या जेवणाचा ...अं ?

अनघाः हो -- करते की -- करते --

अनिलः माझ्या बोलण्याचा त्रास होतोय तुला... मी बोलत नाही आता...शांत हो तू ...

अनघाः ...नाही...मला त्रास होत नाहीय...खरंच मला त्रास होत नाहीय...बोल तू...बोल...खरं... बोल...माझी एक शीला नावाची मैत्रीण आहे नं, ती इतकी बोलते, की आमची हसून हसून पुरेवाट होते...पण मला त्रास नाही होत तिचा...खरंच...आणि तिचे डोळे इतके छान हलतात बोलताना...तिचा एक, दोन वर्षांचा मुलगा

आहे...त्याच्याशीसुध्दा अशीच बडबड करत बसते ती...फार मजा येते...बाबांना सांगणारच आहे मी आता.. तुमचं काही ऐकणार नाही मी ...तुम्ही इथंच राहिलं पाहिजे...म्हणजे आपल्या संतोषला गोष्टी सांगतील की नाही ते ? ...आपल्याला काही त्रास होणार नाही त्यांचा ...त्रास कसा होईल ...बरं, खरं सांग हं ...माझेही डोळे छान आहेत की नाही..आणि भुवया ? ...तरी मेकप नसतो माझा फारसा...होय की नाही...तुला काय वाटलं...मी रागावलेय तुझ्यावर ! छट् ! एखादी तुझी चूक होईल...एखादी माझी चूक होईल...होय की नाही...खरंच नाही...रागावले नाही मी ...आणि मला त्रासही होत नाहीय...कसलाच...तुला वाटलं असेल, की मी घाबरायला लागलेय तुला...मुळीच नाही...घाबरायचं काय त्यात ? नवऱ्याला आपल्याच...छे ...काहीतरीच...( हसते...हसत सुटते...)

अनिलः मोठ्यांदा हसू नकोस अनघा...बाबा झोपलेत ना आत --

अनघाः हो - हो - नाही हंसत - नाही हसत- ( प्रचंड घाबरून - चोरट्यासारखं अनिलकडे पाहात ) ... सांगणार आहेस तू सगळं बाबांना ? सांगू नकोस. नको ना सांगूस त्यांना ...नको ना ...

अनिलः अग, मी काहीही बोलणार नाहीय.

अनघाः म्हातारे झालेत बाबा...( ढासळत जाते.) म्हातारे झालेत... ( हुंदके देते...रडायला लागते. जरा वेळ रडत राहते...मग रडणे थोडे थोडे ओसरून, थकून पडून राहते...अनिल लांबूनच पाहतोय...पण कोणतीही अस्वस्थ प्रतिक्रिया नाही...)

बाबाः ( आतून आवाज ) माधुरी - ए माधुरी --

अनिलः या नं बाबा -- या -- ( बाबा येतात.)

बाबाः कालचं ते पावसाचं झालं आणि नंतर छान झोप लागली बघा...आणि आता लौकर जाग आली..तुम्ही कसे काय जागे ?

अनिलः मलाही लौकर जाग आली.

बाबाः मी फिरून येतो जरा...झोपू द्या तिला...पहाटे कधी कधी जातोच मी फिरायला...( कोट, स्कार्फ वगैरे घेत... )...आमची माधुरी म्हणजे अगदी वेडी आहे...भांडते पण मनात काही नसतं तिच्या ...मनानं अगदी साधी-भोळी आहे ती...आता हे मी काय तुम्हाला सांगायचं म्हणा... बरं येतो मी ...

अनिलः हं --( बाबा जातात. अनिल स्वस्थ बसलेला. अनघा तशीच पडून ...असेच काही क्षण जातात...नंतर खिडकीतून घरात ऊन पडत जाते... चिमण्यांचा चिवचिवाट वाढत जातो...अनिल खिडकीतून बाहेर पाहात पाठमोरा उभा. अनघा जागी होते...जागी होता होता पुन्हा भ्रमिष्ट अवस्थेत अनिलकडे पाहात राहते...)

अनघाः झोपला नाहीस तू ? ... बाबा उठले की नाही अजून ?...आणि मला मात्र झोप लागली...( अनिल वळतो. पाहतो. शांत आणि जिवंत.)

अनिलः बाबा फिरायला गेलेत बाहेर.

अनघाः संपला एकदाचा कालचा दिवस...पण...पण...

अनिलः पण जखमा भरून आलेल्या नाहीत...आणि कधी भरून येणारही नाहीत--- असंच ना ?

अनघाः नाही रे ...येतील भरून...मी विसरायचा प्रयत्न करीन सगळं...

अनिलः एखादी गोष्ट विसरायचा प्रयत्न करावा लागतो तेव्हा कधीच विसरणं शक्य नसतं..

अनघाः ( सुस्कारून जणू काही नॉर्मल होत --) ठीक आहे...चहा करते मी ...बाबा येतीलच एवढ्यात...( उठते)

अनिलः हं. ( अनघा केस नीटनेटके करत आत जाते. अनिल बसून राहतो. काही क्षणांनी बाबा येतात.)

बाबाः हं -- उठली वाटतं माधुरी -- मजा येते हं पहाटे फिरायला. प्रत्येक पहाटेला निसर्ग कसा संपूर्ण नवेपणानं उलगडत जागा होत असतो... आपल्यालाही ते बघून उत्साह वाटतो...शिवाय तब्बेतीच्या तक्रारी कमीत कमी राहातात... आता काय आहे, आम्ही जास्तीत जास्त काळ ठीक राह्यला पाहिजे...उगीच तुम्हा मंडळींना आमच्या आजारपणाचा त्रास होता कामा नये...अं ? माधुरीच्या आईची हल्ली फार आठवण येते बघा...असती तर बरं झालं असतं...असो...आज रजाच आहे ना तुमची ?

अनिलः होय.

बाबाः भांडणं मिटली की नाही ? किरकोळच असतं हो सगळं...पण आपण जिवाच्या करारानं भांडतो...नंतर एखादवेळी पस्तावायची पाळी येते मग...हे म्हणजे अर्थात् तुम्हाला नव्हे हं ...माझं माझ्याशीच बोललो मी ...कुठेतरी काहीतरीच बोलतो मी हल्ली...( अनघा चहाच्या कपबशा घेऊन येते. बाबांना आणि अनिलला

चहा देते. तिघेही चहा पितात. काही क्षण भयानक शांतता...) वा ! झकास ! तुला पहिला मुलगाच होणार माधुरी ! बघा तुम्ही ! आगदी ! नावबिव ठरवलंय की नाही ? ... ( इथे अनघाचा अचानक बांध फुटतो. एकदम् हमसाहमशी रडायला लागते...) अरे अरे अरे!... काय हे माधुरी...अं...( उठून जवळ जातात. तिच्या पाठीवर हात ठेवतात.) अग काय हे ? किती ताणायचं ते ? माधुरी ...

अनघाः काल...काल बलात्कार झालाय माझ्यावर...हा...हा भिऊन पळाला आणि...आणि ते सगळं झालं...आम्ही फिरायला गेलो होतो तेव्हा...आल्यावर मी नाही नाही ते बोलले त्याला...सगळं संपलंय...मी आई होणारच नाही कधी आता...( जास्तच हुंदके देऊ लागते...बाबा अवाक् आणि डोळे विस्फारलेले...अनिल शांत...त्याच्या चेहऱ्यावर आता अजिबात अपराधी भाव नाहीत. इथे फ्लिकर वापरून अनघाचे सांगणे आणि बाबांना प्रचंड धक्का बसत जाणे - हे सुचवावे.)

बाबाः म्हणजे - म्हणजे- ( अचानक हंबरडा फोडल्याप्रमाणे --) ...माधूरी ! ( रडायला लागतात ) ...माधुरी...माधुरी...माझी माधुरी..( दोघेही एकमेकांच्या कुशीत रडताहेत...अनिल शांत उभा...)

अनिलः ( काही क्षणांनी ) रडू नका... आपण निष्कारणच महत्त्व देत राहतो आपापल्या आयुष्याला ...ते कसं असावं ते ठरवत राहतो उगीचच. आणि मग कुठल्याही धक्क्यानं कोसळून जातो आपण...( पण दोघेही हे ऐकण्याच्या मनःस्थितीत नाहीत. स्वतःची प्रचंड कीव करत रडत राहतात...)

बाबाः ...आता काहीच राहिलं नाही आपलं...काहीच नाही...( अनिलला) तुम्हाला मी फार चांगले समजत होतो अनिलराव...माझी मुलगी तुमच्याकडे सुरक्षित आहे असं समजत होतो...पण...पण...

अनिलः सुरक्षित !

बाबाः मी तुला घेऊन जाईन माधुरी माझ्याबरोबर...काही काळजी करू नकोस तू...काळजी करू नकोस...अजून पैसे आहेत शिल्लक माझ्याकडे...आहेत...

अनिलः ठीक आहे. कालचा दिवस कायम चालू ठेवणार आहात तुम्ही. मीही माझ्या आयुष्याला फार महत्त्व देत होतोच...( स्वस्थ बसून राहतो. या भयानक प्रसंगाचा त्याच्यावर काहीही परिणाम नाही.)

अनघाः ( रडतच...) मी सुखात असण्याचं तुमचं सुखही नाहीसं झालं आहे बाबा...सगळं संपलं आहे...सगळंच.. ( दोघेही रडत राहतात... )

.अनिलः ... टिकणारं किंवा संपणारं नेमेकं काय असतं ?...

... पडदा पडत जातो...



पत्ता:- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.वीर सावरकर मार्ग,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९

**दूरध्वनीः २४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**